सुधारित वेतन श्रेणींच्या कमाल वेतनावर
कुंठीत झालेल्या शासकीय कर्मचा-यांना
कमाल वेतनोत्तर वेतनवाढी मंजूर करणे.

स्पष्टीकरण —

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक वेपुर १२८९/१३२/सेवा-१०,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १५ सप्टेंबर १९८९.

# परिपत्रक

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक वेपुर १२८८/५७९/सेवा-१०, दिनांक १४ ऑक्टोबर १९८८ मधील आदेशांची अंमलबजावणी करताना काही मुद्दे उपस्थित होण्याची शक्यता आहे. त्या संबंधात खालीलप्रमाणे खुलासा करण्यात येत आहे:-

| अनु. क्र. | मुद्दा | खुलासा |
|---|---|---|
| १. | खालच्या पदाच्या कमाल टप्प्यावरील दोन वर्षांच्या कुंठीततेची परिगणना करण्यासाठी वरच्या पदावरील तदर्थ स्थानापन्न नियुक्तीचा कालावधी विचारात घेता येईल काय आणि जर कुंठीततेचा कालावधी दोन किंवा अधिक वर्षांचा असेल तर प्रत्यावर्तन झाल्यानंतर कर्मचा-याला कमाल वेतनोत्तर वेतनवाढीचा फायदा देता येईल काय? | होय. |
| २. | दोन वर्षांच्या कालावधीची परिगणना शेवटची वेतनवाढ दिल्यानंतर कर्मचारी वेतनश्रेणीच्या कमाल टप्प्यावर पोहोचल्याच्या दिनांकापासून करावयाची की त्यानंतर एक वर्षांनी करावयाची? | दोन वर्षांच्या कालावधीची परिगणना, शेवटची वेतनवाढ मंजूर केल्यानंतर ज्या दिनांकास कर्मचारी कमाल टप्प्यावर पोहोचेल त्या दिनांकापासून करावी. |
| ३. | कमाल वेतनोत्तर वेतनवाढीचा/वेतनवाढींचा लाभ प्रतिनियुक्तीच्या आधारे धारण केलेल्या संवर्ग बाह्य पदांच्या बाबतीत अनुज्ञेय असेल काय? | [अ] जर कर्मचा-याने वेतन अधिक प्रतिनियुक्तीभत्ता यासाठी विकल्प दिला असेल तर कमाल वेतनोत्तर वेतनवाढीचा लाभ संवर्गातील पदाच्या वेतनश्रेणीमध्ये इतर सर्व अटींची पूर्तता होत असल्यास अनुज्ञेय असेल. |

शासमु-रोटा-विभि-एच-८३३[१५,०००-१४-९-८९]-१

| अनु.क्र. | मुद्दा | खुलासा |
| --- | --- | --- |
| | | प्रतिनियुक्ती भत्ता फक्त मूळ वेतनाच्या आधारे निर्धारित केला जाईल आणि ह्या प्रयोजनासाठी कमाल वेतनोत्तर वेतनवाढ विचारात घेतली जाणार नाही. <br><br> [ब] जर कर्मचाऱ्याने प्रतिनियुक्तीवरील पदाच्या वेतनश्रेणीचा विकल्प दिला असेल तर वेतनमानामध्ये कमाल वेतनोत्तर वेतनवाढ/वेतनवाढी इतर सर्व अटी पूर्ण होत असतील तर मिळू शकतील. |
| ४. | शासकीय कर्मचाऱ्याविरुद्ध शिस्तभंगाची प्रकरणे प्रलंबित असल्यास कमाल वेतनोत्तर वेतनवाढ/वेतनवाढी कशा प्रकारे विनियमित कराव्यात? | शिस्तभंगाची कार्यवाही पूर्ण झाल्यानंतर कमाल वेतनोत्तर वेतनवाढ/वेतनवाढी वार्षिक वेतनवाढीप्रमाणे, म्हणजेच चौकशीचा निष्कर्ष आणि त्यावरील शिस्तविषयक प्राधिकारी (Disciplinary authority) यांचे आदेश या अनुसार विनियमित करण्यात याव्यात. |

ह्या आदेशाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

नरेंद्र कर्णिक,
शासनाचे उप सचिव.

प्रति

महालेखापाल-१ [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-१ [लेखा परीक्षा], महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ [लेखा परीक्षा], महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
सर्व मंत्रालयीन विभाग,

स्च-८३३[१५,०००-१५-९-८९]-१अ

सर्व विभागीय आयुक्त,
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
x प्रबंधक, उच्च न्यायालय [मूळ शाखा], मुंबई,
x प्रबंधक, उच्च न्यायालय [अपील शाखा], मुंबई,
x सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
x सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय [व्यय विभाग], खोली क्रमांक २६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशोब, मुंबई,
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशोब, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड फाईल, वित्त विभाग, सेवा-१०.

---

x पत्राव्दारे.

१९८९ च्या क्रमांक
माहिती व मार्गदर्शनाकरिता प्रत रवाना.

एफ-८७३[१५,०००-१५-९-८९]-२